**नगर रचनाकार (पदवीधारक) (गट-अ/राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांना सहायक संचालक, नगर रचना (पदवीधारक) (गट-अ/राजपत्रित) पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात देण्यात आलेली पदोन्नती रद्द करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन आदेश क्र. पदोन्न-१३२०/प्र.क्र.१३२/२०२०/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक: २८ एप्रिल ,२०२२.**

वाचा :- १) शासन आदेश समक्रमांक दि.२९.०६.२०२१.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२.०९.२०१६

**शासन आदेश :-**

नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील नगर रचनाकार (पदवीधारक) (गट-अ/राजपत्रित) या संवर्गातील अधिकाऱ्यांना सन २०१९-२०२० च्या तात्पुरत्या निवडसूचीतून सहायक संचालक, नगर रचना (पदवीधारक) (गट-अ/राजपत्रित) या पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात शासन आदेश दि.२९.०६.२०२१ अन्वये पदोन्नतीने पदस्थापना देण्यात आली आहे. सदर पदोन्नती आदेशातील पदवीधारक कोटयातील अ.क्र.१४ वर नमूद श्री.सुनिल जयवंतराव देशपांडे (ज्ये.क्र.८३)(खुला) यांनी त्यांना देण्यात आलेली पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपात नाकारली आहे.

**०२.** श्री.सु.ज.देशपांडे यांनी त्यांना देण्यात आलेली सहायक संचालक, नगर रचना पदावरील पदोन्नती नाकारली असल्यामुळे सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२.०९.२०१६ अनुसार त्यांचे नाव सन २०१९-२०२० च्या तात्पुरत्या निवडसूचीतून वगळण्यात येत आहे. त्याचप्रमाणे श्री.सु.ज.देशपांडे यांच्या नावाचा पुढील दोन वर्षी म्हणजेच सन २०२०-२०२१ व सन २०२१-२०२२ मध्ये होणाऱ्या निवडसूच्यांमध्ये विचार न करता तिसऱ्या वर्षी म्हणजेच सन २०२२-२०२३ मध्ये होणाऱ्या निवडसूचीत सहायक संचालक, नगर रचना पदावरील पदोन्नतीसाठी त्यांची पात्रता तपासण्यात येईल.

**०३.** सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक : एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२.०९.२०१६ मधील क्रमांक ८ अनुसार श्री.सु.ज.देशपांडे, नगर रचनाकार यांनी पदोन्नती नाकारली असल्यामुळे आश्वासित प्रगती योजनेअंतर्गत लाभ दिले असल्यास ते काढून घेण्यासंदर्भात वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/आदेशांनुसार संचालक, नगर रचना आणि मूल्यनिर्धारण संचालनालय, पुणे यांनी कार्यवाही करावी.

**०४.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक **२०२२०४२८१३२५४६१३२५** असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vijay Karbhari Chaudhari

Digitally signed by Vijay Karbhari Chaudhari
DN: CN = Vijay Karbhari Chaudhari, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2022.04.28 14:53:37 +05'30'

**(विजय चौधरी)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति :-**

**संबंधित अधिकारी यांना.**

**प्रत :-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव
२. मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.उपमुख्यमंत्री महोदयांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.मंत्री/मा.राज्यमंत्री, नगर विकास महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा.सभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
६. मा.अध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८. मा.उपसभापती, महाराष्ट्र विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
९. मा.उपाध्यक्ष, महाराष्ट्र विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
१०. सर्व सन्माननीय विधानपरिषद/विधानसभा सदस्य
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१.मुंबई.
१२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१३. अपर मुख्य सचिव (सेवा) यांचे स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. अपर मुख्य सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. अपर मुख्य सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई/नागपूर.
१७. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१.
१८. संबंधित सह संचालक, नगर रचना.
१९. संबंधित उप संचालक, नगर रचना.
२०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२१. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नागपूर.
२२. संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
२३. निवडनस्ती / नवि-२७.

*****